नियमित निवडसूची, २०२४-२५:

*"सशस्त्र पोलीस उप अधीक्षक/ सहायक समादेशक, रा.रा.पोलीस बल" या संवर्गातील पदावर पदोन्नतीने पदस्थापना करणेबाबत.*

## महाराष्ट्र शासन
## गृह विभाग
### शासन आदेश क्र.रापोसे-०२२५/प्र.क्र.४४/पोल-१अ.

मंत्रालय, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई. पिन-४०००३२.

दिनांक : ३० मे २०२५.

**संदर्भ** :-
१) शा.नि., सा.प्र. विभाग, क्र.एसआरव्ही-२०१८/ प्र.क्र.१५९/ कार्या.-१२, दिनांक ०१.०८.२०१९.
२) शा.नि., सा.प्र. विभाग, क्र.बीसीसी-२०१८/ प्र.क्र.३६६/१६-ब, दिनांक ०७.०५.२०२१.
३) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, यांच्या कार्यालयाचे पत्र क्र. पोमसं/२/नि.सू.-२४-२५/ सहा.समा./११५/२०२४, दि.०८.०५.२०२५.
४) शासन पत्र, गृह विभाग, क्र.रापोसे-०२२५/प्र.क्र.४४/पोल-१अ, दिनांक ३०.०५.२०२५.

**शासन आदेश.**

"सशस्त्र पोलीस निरीक्षक" या संवर्गातील पदावरुन "सशस्त्र पोलीस उप अधीक्षक/ सहा. समादेशक, रा.रा. पोलीस बल" या संवर्गातील पदावर पदोन्नती देण्याकरिता तयार करण्यात आलेल्या नियमित निवडसूची सन २०२४-२५ यामध्ये समाविष्ट असलेल्या, पुढील तक्त्यातील स्तंभ (२) मध्ये नमूद पोलीस अधिका-यांना "सशस्त्र पोलीस उप अधीक्षक/ सहा. समादेशक, रा.रा. पोलीस बल" या संवर्गातील पदावर तात्पुरत्या स्वरुपात, पुढील अटींवर, पदोन्नती देण्यात येत असून, त्यांची स्तंभ (३) मध्ये निर्दिष्ट पदावर, याद्वारे, पदोन्नतीने पदस्थापना करण्यात येत आहे-

| अ.क्र. | नाव | पदोन्नतीने पदस्थापना |
|---|---|---|
| (१) | (२) | (३) |
| १. | श्री. रामदास महिपत काळे | सहायक समादेशक, रा.रा.पोलीस बल, गट क्र.७, दौंड |
| २. | श्री. ईश्वर रतन सरदार | सहायक समादेशक, रा.रा.पोलीस बल, गट क्र.६ धुळे |

अटी:-

१) उक्त पदोन्नती ही विशेष अनुमती याचिका क्र.२८३०६/२०१७ या प्रकरणात मा.सर्वोच्च न्यायालयाच्या न्यायनिर्णय व आदेश यांच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

२) उक्त पदोन्नती ही शा.नि., सा.प्र. विभाग, क्र.बीसीसी-२०१८/प्र.क्र.३६६/१६-ब, दिनांक ०७.०५.२०२१, यास आव्हान देण्यात आलेल्या प्रकरणात मा. मुंबई उच्च न्यायालयाच्या न्यायनिर्णयाच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

३) उक्त पदोन्नती ही निव्वळ तात्पुरत्या स्वरुपाची असल्याने या तात्पुरत्या पदोन्नतीमुळे संबंधित अधिकारी यांना नियमाधीनतेचा *(regularization)* व सेवाज्येष्ठतेचा *(seniority)* कोणताही हक्क असणार नाही.

४) उक्त निवडसूचीस महाराष्ट्र लोकसेवा आयोगाची मान्यता घेण्याच्या अधीन तात्पुरती पदोन्नती देण्यात येत आहे.

२. त्या अनुसार, पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, यांनी मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण/ न्यायालय यांचे आदेश, कायदा व सुव्यवस्था, इत्यादी लक्षात घेऊन पुढील उचित कार्यवाही करावी.

३. हा शासन आदेश, सामान्य प्रशासन विभागाच्या मान्यतेने *[अनौपचारिक संदर्भ क्र.-/ २०२५/का.-१२ (सेवा-३), दिनांक २९/०५/२०२५]* आणि महाराष्ट्र पोलीस अधिनियम (१९५१ चा २२) याच्या कलम २२न मधील तरतुदींनुसार सर्वोच्च सक्षम प्राधिकारी यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०५३०१६२५२९८५२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SANDEEP GORAKHNATH DHAKANE

Digitally signed by SANDEEP GORAKHNATH DHAKANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=418588839686584ca25060bf57af23a4473234ebcc421d084d8890fc37c8f673, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=E7B44D71EACB46FA051532FB66A73DA715F678033161C1162FA83F6713D03552, cn=SANDEEP GORAKHNATH DHAKANE
Date: 2025.05.30 16:26:18 +05'30'

**(संदीप गोरखनाथ ढाकणे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) मा. मुख्यमंत्री (गृह) यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा. राज्यमंत्री (गृह) (शहरे/ग्रामीण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) पोलीस महासंचालक व महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

**प्रत-**

१) अपर पोलीस महासंचालक, रा.रा. पोलीस बल, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) पोलीस उप महानिरीक्षक, रा.रा. पोलीस बल, पुणे/ नाशिक.
३) संबंधित समादेशक, रा.रा. पोलीस बल *[अपर पोलीस महासंचालक, रा.रा. पोलीस बल, यांच्यामार्फत].*
४) संबंधित पोलीस अधिकारी *(पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, यांच्यामार्फत).*
५) निवड फाईल, पोल-१अ.

**प्रत-**

१) प्रधान महालेखापाल (लेखा व हकदारी/ लेखा परीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई.
२) अधिदान व लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
३) निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
४) जिल्हा कोषागार अधिकारी पुणे/नाशिक.